**अनधिकृत बांधकाम / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांचे आस्थापनेवर पोलीस दलातील विविध संवर्गातील ७० पदे निर्माण करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०८१४/प्र.क्र.८/पोल-३

मंत्रालय, जागतिक व्यापार केंद्र,सेंटर-१, कफ परेड, मुंबई ४०० ००५.
तारीख: १ सप्टेंबर २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/ नवि-२८, दिनांक २ मार्च २००९.

२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.नं.मनपा/आस्था/शा.प./५०/२०१२-१३, दिनांक १५ ऑक्टोबर २०१२

३) मिरा-भाईंदर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.४३, दिनांक १९ नोव्हेंबर २०१३

४) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.नं.मनपा/आस्था/शा.प./५०/२०१२-१३, दि.१५ ऑक्टोबर २०१२ व जा.नं.मनपा/आस्था/३०/२८२०/२०१३-१४, दि. ४ डिसेंबर २०१३

**प्रस्तावना**

राज्यातील शहरांमध्ये अनधिकृत बांधकामे व अतिक्रमणाची समस्या दिवसेंदिवस अत्यंत गंभीर होत असल्याने, राज्यातील शहरांमधील अनधिकृत बांधकामे व अतिक्रमण नियंत्रणासाठी प्रभावी व सर्वंकष योजनेस दिनांक २५ फेब्रुवारी २००९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली. त्यानुसार राज्यातील नागरी भागातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनाकरिता नागरी पोलीस यंत्रणा व स्वतंत्र विशेष पोलीस ठाणे निर्माण करण्याचा निर्णय घेण्यात येऊन तसा शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/ नवि-२८, दिनांक २ मार्च २००९ अन्वये निर्गमित केला आहे. त्यानुसार मिरा-भाईंदर महानगरपालिका क्षेत्रातील नागरी पोलीस यंत्रणेसाठी व नागरी गुन्हयासाठी स्वतंत्र विशेष पोलीस ठाण्यासाठी मनुष्यबळ निर्माण

करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उपरोक्त ३ येथील दिनांक १५ ऑक्टोबर २०१२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला.

या संदर्भात मुख्य सचिव तथा अध्यक्ष, उच्चस्तरीय समिती यांच्याकडे दिनांक ५ ऑक्टोबर २०१२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये नागरी भागातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनाकरिता विशेष पोलीस ठाण्याऐवजी पोलीस आयुक्तांच्या कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष कक्ष स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

उपरोक्त निर्णयानुसार आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उपरोक्त ४ येथील पत्रान्वये सुधारित प्रस्ताव महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेच्या ठरावासह नगर विकास विभागास सादर केला आहे. त्यानुसार पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांचे आस्थापनेवर नागरी पोलीस यंत्रणेसाठी ५३ व पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष कक्षासाठी १७ अशी एकूण ७० पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## <u>शासन निर्णय</u>

उपरोक्त प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन, मिरा-भाईंदर महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी पोलीस आयुक्त, ठाणे यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली मिरा-भाईंदर महानगरपालिका ("ड" वर्ग) क्षेत्रात सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नागरी पोलीस यंत्रणेसाठी विविध संवर्गातील ५३ पदे निर्माण करण्यास तसेच पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष कक्ष स्थापन करण्याकरिता विविध संवर्गातील १७ पदे अशी एकूण ७० पदे पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या आस्थापनेवर निर्माण करुन त्यांच्या सेवा मिरा-भाईंदर महानगरपालिके-

करिता उपलब्ध करुन देण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अटी / शर्ती मिरा-भाईंदर महानगरपालिकेवर बंधनकारक राहतील.

१) नागरी पोलीस यंत्रणेसाठी व आर्थिक गुन्हे शाखेशी संलग्न स्वतंत्र विशेष कक्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या पोलीस अधिकारी / कर्मचारी यांच्यावर प्रशासकीय नियंत्रण पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांचे राहील.

२) मंजूर अधिकारी व कर्मचारी यांच्या पदाचे वेतन व भत्ते व इतर आवर्ती / अनावर्ती खर्च शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/नवि-२८, दिनांक २ मार्च, २००९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे मिरा-भाईंदर महानगरपालिकेने करावयाचा आहे.

३) नागरी पोलीस यंत्रणा व विशेष कक्षासाठी नागरी गुन्ह्याविषयी माहिती व्हावी याकरिता महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम तसेच त्यांच्याशी संबंधित इतर अधिनियमांमधील तरतुदीविषयीचे प्रशिक्षण सत्र आयोजित करण्याची जबाबदारी मिरा-भाईंदर महानगरपालिकेची राहील.

४) घरभाडे मुक्त निवास व्यवस्था पुरविण्याची जबाबदारी मिरा-भाईंदर महानगरपालिकेची राहील. जेथे घरभाडे मुक्त निवास व्यवस्था उपलब्ध नसेल तेथे राज्य शासनाच्या नियमाप्रमाणे घरभाडे भत्ता देय राहील.

५) पोलीस अधिकारी / कर्मचारी यांना गणवेश भत्ता, दारुगोळा, शरीर संरक्षण किट, लाठी, शस्त्र, हेल्मेट, प्लास्टिक शिल्ड, वाहने आणि इतर आवश्यक संरक्षणविषयक साधन-सामुग्रीसाठी लागणारा खर्च मिरा-भाईंदर महानगरपालिकेने आगाऊ उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

६) पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता कार्यालयीन जागा, फर्निचर, आवश्यक वाहने, दूरध्वनी, संगणक, इंटरनेट, बिनतारी संदेश यंत्रणा तसेच दैनंदिन लागणारी

कार्यालयीन साधनसामुग्री मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

७) सदर पदांवरील वेतन व वेतनेतर खर्चाची आगावू तिमाही रक्कम मिरा-भाईंदर महानगरपालिकेने पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्याकडे वेळोवेळी जमा करावी.

८) उपरोक्त अटीमधील काही खर्चाच्या बाबी राहिल्या असतील तर पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांनी मागणी केल्यावर संबंधित महानगरपालिका यांनी त्याची भरपाई करणे बंधनकारक राहील.

९) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करावयाची आहेत त्या प्रयोजनासाठीच वापरणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०३१५१३५४४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: CN = Charushila Chandrakant Tambekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.09.03 15:56:10 +05'30'

**चारुशीला तांबेकर**
शासनाच्या सहसचिव

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (गृह) यांचे स्वीय सहायक
५) मा.राज्यमंत्री (गृह) यांचे स्वीय सहायक
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

७) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका..
८) प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१०) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) पोलीस आयुक्त, ठाणे शहर
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३) कोषागार अधिकारी, ठाणे
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१५) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
१६) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / विनियम), मंत्रालय, मुंबई
१७) गृह विभागातील सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव /कार्यासन अधिकारी
१८) गृह विभागाच्या अधिनस्त सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
१९) निवड नस्ती, पोल-३.

## विवरणपत्र-अ

अनधिकृत बांधकाम / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी मिरा-भाईंदर महानगरपालिका ("ड" वर्ग) क्षेत्रात नागरी पोलीस यंत्रणेसाठी तसेच आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या आस्थापनेवर निर्माण करावयाची पदे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | असुधारित वेतनश्रेणी (पाचवा वेतन आयोग) | सुधारित वेतनश्रेणी (सहावा वेतन आयोग) |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक पोलीस आयुक्त / पोलीस उपअधिक्षक | १ | ८०००-२७५-१३५०० | पे बॅण्ड १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० |
| २ | पोलीस निरीक्षक | १ | ७४५०-२२५-११५०० | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ५००० |
| ३ | पोलीस उपनिरीक्षक | ४ | ५५००-१७५-९००० | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० |
| ४ | पोलीस हवालदार | ४ | ४०००-१००-६००० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० + विशेष वेतन ५०० |
| ५ | पोलीस नाईक | ३ | ४०००-१००-६००० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० + विशेष वेतन ४८० |
| ६ | सशस्त्र पोलीस शिपाई | २४ | ३२००-८५-४९०० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २००० + विशेष वेतन ५०० |
| ७ | महिला पोलीस शिपाई | १६ | ३२००-८५-४९०० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २००० + विशेष वेतन ५०० |
| -- | एकूण ... | ५३ | -- | -- |

## विवरणपत्र-ब

अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी मिरा-भाईंदर महानगरपालिका ("ड" वर्ग) क्षेत्रात पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी स्थापन करावयाच्या स्वतंत्र कक्षासाठी आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या आस्थापनेवर निर्माण करावयाची पदे ...

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | असुधारित वेतनश्रेणी (पाचवा वेतन आयोग) | सुधारित वेतनश्रेणी (सहावा वेतन आयोग) |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक पोलीस निरीक्षक | १ | ६५००-२००-१०५०० | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० |
| २ | पोलीस उपनिरीक्षक | १ | ५५००-१७५-९००० | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० |
| ३ | सहायक पोलीस उपनिरीक्षक | १ | ४५००-१२५-७००० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० |
| ४ | सशस्त्र पोलीस हवालदार | ४ | ४०००-१००-६००० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० + विशेष वेतन ५०० |
| ५ | सशस्त्र पोलीस शिपाई | ८ | ३२००-८५-४९०० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २००० + विशेष वेतन ५०० |
| ६ | कनिष्ठ लिपिक | १ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० |
| ७ | वाहन चालक | १ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० |
| -- | एकूण ... | १७ | -- | -- |